**महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत प्रायोगिक तत्वावर राबविण्यात येणा-या रेशीम उद्योग विकास योजनेत नागपूर व वर्धा जिल्ह्यांचा समावेश करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग
### शासन निर्णय क्रमांकः मग्रारो-२०१४/प्र.क्र.७९/रोहयो-५

नविन प्रशासकीय भवन, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १० एप्रिल, २०१५.

**वाचा -**

**१) शासन निर्णय क्रमांकः मग्रारो-२०१३/प्र.क्र.१३७/रोहयो-१, दिनांक ०४ मार्च, २०१५.**

**प्रस्तावना -**

महाराष्ट्रातील कृषि हवामान आणि जमीन विषयक परिस्थिती तुती लागवडीस व रेशीम कोष निर्मितीसाठी अनुकुल आहे. तुतीची लागवड व रेशीम किटकांचे संगोपन ही कामे किफायतशीर आहेत. महाराष्ट्रातील कृषि हवामान, शेती विषयी पर्यावरणा संबंधीचे प्रश्न, ग्रामीण भागात रोजगार निर्मिती व उच्च मुल्यांकित पीक रचना या सर्व गोष्टींचा विचार केल्यास तुती लागवडीद्वारे रेशीम उत्पादन उद्योगास महाराष्ट्रात भरपूर वाव आहे. राज्यात सद्य:स्थितीत केंद्र पुरस्कृत सी.डी.पी. योजना व राष्ट्रीय कृषि विकास योजना या अंतर्गत रेशीम उद्योग विकासाचा कार्यक्रम राबविण्यात येत आहे. याबाबत केंद्र शासनाने मार्गदर्शक सुचना प्रसिद्ध केली आहे. त्यास अनुसरुन राज्यात महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत रेशीम उद्योग विकासाची योजना प्रायोगिक तत्वावर राबविण्यात येत आहे. याबाबत दि ०४ मार्च,२०१४ अन्वये शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयानुसार या योजने अंतर्गत तुती लागवड बीड, जालना व औरंगाबाद जिल्हयात प्रायोगिक तत्वावर घेण्यात आली आहे. या जिल्हयांमध्ये महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत ४५० एकर तुती लागवडीचे लक्षांक देण्यात आले होते. त्यास अनुसरुन ७२० एकर क्षेत्रावर तुती लागवड झालेली आहे. सदर बाबींचा विचार करुन महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत तुती लागवड कार्यक्रमामध्ये नागपूर व वर्धा जिल्हयांचा समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय-

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत घेण्यात येणा-या रेशीम उद्योग विकास योजनेअंतर्गत तुती लागवड कार्यक्रम, उपरोक्त नमुद दिनांक ०४/०३/२०१४ च्या शासन निर्णयात उल्लेखित

केलेल्या बीड, जालना व औरंगाबाद या जिल्हयांबरोबर नागपूर व वर्धा जिल्हयातही राबविण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदर योजना नागपूर व वर्धा जिल्हयाकरीता शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून लागू करण्यात येत आहे. या योजने बाबतची ठळक वैशिष्टये, योजनेची कार्यपद्धती, लाभार्थी निवड व तद्नुषंगिक बाबी शासन निर्णय दि. ०४ मार्च,२०१४ मध्ये नमुद केल्याप्रमाणेच राहतील.

सदर शासन निर्णय सहकार व वस्त्रोद्योग विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४१०१७३०४००६१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vimala R

Digitally signed by Vimala R
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vimala R
Date: 2015.04.15 12:08:23 +05'30'

**( आर. विमला )**
उप सचिव (रोहयो)

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय ,मुंबई
४. मुख्य सचिवांचे स्वीय सहायक
५. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव ,मंत्रालय मुंबई
६. संचालक,अर्थ व सांख्यिकी संचालनालय.
७. महासंचालक,माहीती व जनसंपर्क मंत्रालय ,मुंबई.
८. सर्व विभागिय आयुक्त.
९. आयुक्त. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना, नागपूर.
१०.सर्व जिल्हाधिकारी.
११.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद
१२.प्रधान मुख्य वन संरक्षक, नागपूर
१३.आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
१४.संचालक,(रेशीम) संचालनालय ,महाराष्ट्र राज्य ,नागपूर

१५.महालेखापाल, (महाराष्ट्र राज्य) लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/नागपूर

१६.महालेखापाल, (महाराष्ट्र राज्य) लेखा परिक्षा, मुंबई/नागपूर

१७.सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो)

१८. सर्व जिल्हा रेशीम विकास अधिकारी

१९.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी

२०.सर्व उप सचिव/ अवर सचिव/कक्ष अधिकारी नियोजन विभाग (रोहयो)

२१.निवड नस्ती रोहयो-५